**अंगणवाडी इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषद, नंदुरबार यांना सन २००९-१० ते २०१३-१४ (जिल्हा वार्षिक योजना सर्वसाधारण, जिल्हा वार्षिक योजना-आदिवासी उपयोजना, १३ वा वित्त आयोग, एकवेळ मानव विकास कार्यक्रम) मध्ये प्राप्त झालेल्या निधीपैकी अखर्चित निधी सन २०१५-१६ मध्ये खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/प्र.क्र.२९२/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ ऑक्टोंबर, २०१५

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण-१०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय, दि.६ जून, २००८
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांचे पत्र क्र.जिपन/मबावि/वि.अ./अखर्चित/७११/२०१५, दिनांक २९/०९/२०१५
३) शासन निर्णय वित्त विभाग, क्र.संकीर्ण-१०.१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय, दिनांक २५/०८/२०१५

**<u>प्रस्तावना</u> :-** वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ च्या दिनांक ६ जून, २००८ च्या शासन निर्णयानुसार अखर्चित अनुदान हे लगतच्या एक वर्षापर्यंत खर्च करण्यास अनुमती आहे. जिल्हा परिषद, नंदुरबार यांना जिल्हा वार्षिक योजना सर्वसाधारण, जिल्हा वार्षिक योजना-आदिवासी उपयोजना, १३ वा वित्त आयोग, एकवेळ मानव विकास कार्यक्रम अंतर्गत रुपये ३०९३.७५ लक्ष (अक्षरी रुपये तीस कोटी त्र्याण्णव लाख पंचाहत्तर हजार फक्त) इतका निधी सन २००९-१० ते सन २०१३-१४ या वर्षात अंगणवाडी बांधकामासाठी उपलब्ध करुन देण्यात आला होता. तथापि नंदुरबार जिल्हा परिषदेकडे सदर निधीपैकी रुपये ७४२.६० लक्ष (अक्षरी रुपये सात कोटी बेचाळीस लाख साठ हजार फक्त) इतका निधी अखर्चित राहिला होता. सदर अखर्चित निधी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात खर्च करण्यास परवानगी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** सन २००९-१० ते सन २०१३-१४ या आर्थिक वर्षात जिल्हा परिषद, नंदुरबार यांना जिल्हा वार्षिक योजना सर्वसाधारण, जिल्हा वार्षिक योजना-आदिवासी उपयोजना, १३ वा वित्त आयोग, एकवेळ मानव विकास कार्यक्रम अंतर्गत रुपये ३०९३.७५ लक्ष (अक्षरी रुपये तीस कोटी त्र्याण्णव लाख पंचाहत्तर हजार फक्त) इतका निधी सन २००९-१० ते सन २०१३-१४ या वर्षात अंगणवाडी बांधकामासाठी उपलब्ध करुन देण्यात आला होता. तथापि नंदुरबार जिल्हा परिषदेकडे सदर निधीपैकी रुपये ७४२.६० लक्ष (अक्षरी रुपये सात कोटी बेचाळीस लाख साठ हजार फक्त) इतका निधी अखर्चित राहिला होता. याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांनी वरील सर्व स्त्रोतामधून प्राप्त झालेला निधी व शिल्लक निधीबाबत आढावा घेतला आहे या अटीच्या अधिन राहून उपरोक्त नमूद अखर्चित निधीपैकी पुर्ण झालेल्या अंगणवाडी बांधकामासाठी देय रक्कम रुपये ४१८.३२ लक्ष व प्रगतीपथावरील कामांसाठी देय असलेला

निधी रुपये ३२४.२८ लक्ष अशाप्रकारे एकूण रुपये ७४२.६० लक्ष (अक्षरी रुपये सात कोटी बेचाळीस लाख साठ हजार फक्त) इतका निधी सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात दिनांक ३१/०३/२०१६ पर्यंत खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) जी कामे भौतिकदृष्टया पुर्ण झाली आहेत व खर्चाच्या परवानगी अभावी देयकाचे प्रदान होऊ शकत नाही अशा कामावर निधी खर्च करण्यात यावा. तसेच त्या कामावर इतर स्त्रोतातून खर्च न झाल्याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांनी करावी.

आ) जी कामे सुरु होऊन भौतिकदृष्टया अपुर्ण आहेत ती कामे पुढील दिनांक ३१/०३/२०१६ पर्यंत पुर्ण होतील असे नियोजन करुन सदर निधी दिनांक ३१/०३/२०१६ पर्यंत खर्च करण्यात येईल याची दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांनी घ्यावी.

इ) जी कामे अद्याप सुरु झालेली नाहीत त्या कामांचा निधी तात्काळ शासनास समर्पित करावा.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०.१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय, दिनांक २५/०८/२०१५ अन्वये अखर्चित निधी खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२९१०२७४६८८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasave Vijesing F

Digitally signed by Vasave Vijesing F
DN: c=IN, o=Govt of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasave Vijesing F
Date: 2015.10.29 15:13:57 +05'30'

**(वि. फ. वसावे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई नागपूर
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई
३) जिल्हाधिकारी, नंदुरबार
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार
५) उपमुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण), जिल्हा परिषद, नंदुरबार
६) वित्त विभाग, व्यय-६ व अर्थोपाय शाखा, मंत्रालय, मुंबई
७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार
९) महिला व बाल विकास विभाग, कार्या.४, मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती / का.६

## शासन निर्णय क्र.एबावि-२०१५/प्र.क्र.२९२/का.०६, दिनांक २९/१०/२०१५ सोबतचे विवरणपत्र

**अ) योजनेचे नांव :- जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण)** (रुपये लाखात)

| अ. क्र. | वर्ष | मंजूर निधी | पूर्ण झालेल्या कामासाठी आवश्यक निधी | प्रगतीपथावरील कामासाठी आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २००९-१० | १३३.०० | ८.२६ | २.३६ |
| २ | २०१०-११ | ८४०.०० | ५५.७० | १८०.५७ |
| | **एकूण** | **९७३.००** | **६३.९६** | **१८२.९३** |

**ब) योजनेचे नांव :- जिल्हा वार्षिक योजना - आदिवासी उपयोजना (सर्वसाधारण)** (रुपये लाखात)

| अ. क्र. | वर्ष | मंजूर निधी | पूर्ण झालेल्या कामासाठी आवश्यक निधी | प्रगतीपथावरील कामासाठी आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २०१०-११ | ५६५.०० | ६९.७२ | १९.८० |
| २ | २०११-१२ | ४२.५० | १.०९ | ०.४५ |
| ३ | २०१३-१४ | ८३७.०० | ८.०० | ७७.७५ |
| | **एकूण** | **१४४४.५०** | **७८.८१** | **९८.००** |

**क) योजनेचे नांव :- १३ वा वित्त आयोग** (रुपये लाखात)

| अ. क्र. | वर्ष | मंजूर निधी | पूर्ण झालेल्या कामासाठी आवश्यक निधी | प्रगतीपथावरील कामासाठी आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २०११-१२ | ७६.०० | ०० | २.२५ |
| २ | २०१२-१३ | १०३.०० | २६.६३ | ०० |
| | **एकूण** | **१७९.००** | **२६.६३** | **२.२५** |

**ड) योजनेचे नांव :- एकवेळ मानव विकास कार्यक्रम** (रुपये लाखात)

| अ. क्र. | वर्ष | मंजूर निधी | पूर्ण झालेल्या कामासाठी आवश्यक निधी | प्रगतीपथावरील कामासाठी आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|
| | २०११-१२ | ४९७.२५ | २४८.९२ | ४१.१० |
| | **एकूण** | **४९७.२५** | **२४८.९२** | **४१.१०** |

**पुर्ण झालेल्या कामांसाठी एकूण देय रक्कम रुपये (अ+ब+क+ड) :- ४१८.३२ लक्ष**

**प्रगतीपथावरील कामांसाठी एकूण देय रक्कम रुपये (अ+ब+क+ड) :- ३२४.२८ लक्ष**

**एकूण रुपये (अ+ब+क+ड) :- ७४२.६० लक्ष**

**(अक्षरी रुपये सात कोटी बेचाळीस लाख साठ हजार फक्त)**

Vasave Vijesing F

Digitally signed by Vasave Vijesing F
DN: c=IN, o=Govt of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasave Vijesing F
Date: 2015.10.29 15:14:17 +05'30'

**(वि. फ. वसावे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**